**तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करीता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- इतके अनुदान वितरणास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : बीजीटी-२०२४/प्र.क्र.५१/अर्थसंकल्प**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १) मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील दि.१४.०६.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त, नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४
२) नगर विकास विभाग, शासन आदेश क्र.बैठक-२०२४/प्र.क्र.२१८/नवि-१८, दि.२२.०६.२०२४
३) शासन पत्र सममांक दि.२४.०६.२०२४ व दि.२६.०६.२०२४
४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/३३८/२०२४, दि.२५.०६.२०२४
५) शासन निर्णय समक्रमांक दि.०१.०७.२०२४
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/३५७/२०२४, दि.०२.०७.२०२४
७) शासन ज्ञापन समक्रमांक दि.०३.०७.२०२४, दि.१५.७.२०२४ व दि.२४.७.२०२४
८) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/३६१/२०२४, दि.०४.०७.२०२४
९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/४१७/२०२४, दि.२२.०७.२०२४
१०) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साप्र/२/आरआर/४२६/२०२४, दि.२६.०७.२०२४

**ज्ञापन :-**

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१४ जून, २०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीत तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करिता मानाच्या १० पालख्यांसोबत येणाऱ्या प्रत्येक दिंडीला रु.२०,०००/- इतके अनुदान सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत देण्याबाबत संदर्भाधीन क्र.५ येथील दि.०१.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, पुणे यांच्या दि.०२.०७.२०२४ रोजीच्या प्रस्तावान्वये तिर्थक्षेत्र पंढरपूर येथील आषाढी एकादशी यात्रा सन २०२४ करिता मानाच्या १० पालख्यांपैकी ०८ मानाच्या पालख्यांसोबतच्या ८१२ दिंड्यांना संदर्भाधीन दि.०३.०७.२०२४, दि.१५.७.२०२४ व दि.२४.७.२०२४ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये निधी वितरणास मान्यता देण्यात आली आहे. आता विभागीय आयुक्त, पुणे यांनी दि.२६.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये श्री ज्ञानेश्वर महाराज संस्थान, आळंदी पालखी सोहळा, पुणे या पालखी सोहळ्यासोबतच्या एकूण ३५ दिंड्यांची यादी सादर केली असून या ३५ दिंड्यांना प्रती दिंडी रु.२०,०००/- (अक्षरी रुपये वीस हजार फक्त) याप्रमाणे एकूण रु.७,००,०००/- (अक्षरी रुपये सात लाख फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (श्री ज्ञानेश्वर महाराज संस्थान, आळंदी पालखी सोहळा, पुणे या पालखी सोहळ्यासोबतच्या ३५ दिंड्यांची यादी सोबतच्या परिशिष्ट-अ प्रमाणे)

२. विभागीय आयुक्त, पुणे यांच्या दि.०२.०७.२०२४, दि.०४.०७.२०२४, दि.२२.७.२०२४ व दि.२६.७.२०२४ रोजीच्या पत्रांन्वये मानाच्या १० पालखी सोहळ्यांपैकी ०९ मानाच्या पालख्यांसोबतच्या ८४७ दिंड्यांची माहिती

प्राप्त झाली असून उर्वरित ०१ मानाच्या पालख्यांसोबतची माहिती प्राप्त झाल्यानंतर त्या दिंड्यांना निधी वितरीत करणेबाबत शासन ज्ञापन निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

३. दिंडी प्रमुखांच्या खात्यावर निधी जमा करण्याच्या कार्यवाहीसाठी आभासी वैयक्तिक ठेव लेखा VPDA प्रणालीस सूट देण्यात येत आहे. एम.टी.आर.३१ वर देयके सादर करण्यास व शासन निर्णय दि.१७.४.२०१५ मध्ये नमूद मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यास तसेच देयकांसोबत उपप्रमाणाऐवजी या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या लाभार्थ्याीच्या यादीवर Pass for payment करुन देयके कोषागारामध्ये सादर करण्यास याद्वारे विशेष बाब म्हणून मंजूरी देण्यात येत आहे.

४. एम.टी.आर.३१ वर देयके सादर करण्यास मंजूरी देण्यात आली असल्यामुळे दरपत्रकाची साक्षांकित प्रत जोडण्याची अट व माहिती व जनसंपर्क महासंचालनाची मान्यता घेण्याची तसेच देयकांसोबत जाहिरातीचा आकार विहित आकार दर्शविणारे माहिती व जनसंपर्क महासंचालनायचे पत्र व तिसरी प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास पाठविण्याची अट आणि देयकांसोबत उपप्रमाणाऐवजी या शासन निर्णया सोबत जोडण्यात आलेल्या लाभार्थ्यांच्या यादीवर Pass for payment करुन देयके कोषागारामध्ये सादर करण्यास याद्वारे विशेष बाब म्हणून मंजूरी देण्यात आली असल्याने सदर लाभार्थ्यांच्या यादीलाच उपप्रमाणक म्हणून ग्राह्य धरण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर प्रकरणी जाहिराती संबंधीत उपरोक्त सर्व अटी शिथिल करण्यात येत आहेत.

५. यासाठी होणारा खर्च हा “मागणी क्र.एन-३ मधील लेखाशिर्ष २२३५बी३६१, २६-जाहिरात व प्रसिध्दी” या उद्दिष्टाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. सदरील योजेनेसाठी निधी वितरणास उपायुक्त सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना “नियंत्रक अधिकारी” तसेच तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” एक वेळची बाब म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी तहसिलदार सामान्य प्रशासन, पुणे विभाग, पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले आहे.

६. सदर ज्ञापन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.४.२०१५ वित्तीय अधिकर नियम पुस्तिका, १९७८, भाग-१ उपविभाग-२, मधील अ.क्र.८, नियम क्र.१७, नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६१८/२०२४/व्यय-१४, दि.२९.०६.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञाापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१६१७५२२३९८२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.08.16 18:08:41 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
५. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १ / २ मुंबई / नागपूर
७. अवर सचिव, रोखशाखा, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा. श्री. अक्षयमहाराज भोसले, सातारा, प्रदेशाध्यक्ष, शिवसेना धर्मवीर अध्यात्मिक सेना, महाराष्ट्र
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती (अर्थसंकल्प/विघयो)

| संत शिरोमणी श्री.संत ज्ञानेश्वर महाराज संस्थान, आळंदी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **दिंडीचे नांव** | **दिंडी प्रमुखाचे नांव** |
| **शासन ज्ञापन क्रमांक : बीजीटी-२०२४/प्र.क्र.५१/अर्थसंकल्प, दि.१६.०८.२०२४ सोबतचे परिशिष्ट-अ** | | |
| १ | वैजिनाथ बुवा वारकरी दिंडी | श्री.ज्ञानोबा वैजिनाथ गायकवाड |
| २ | खंडू पांडूरंग वाघमोडे दिंडी | श्री.खंडू पांडूरंग वाघमोडे |
| ३ | गोमाता दिंडी | राम ऊर्फ शंकर काळे |
| ४ | श्री.संत कैकाडी महाराज दिंडी | श्री.सत्यवान देविदास जाधव |
| ५ | मोहकलकर दिंडी | सुखदेव निवृत्ती रणपिसे |
| ६ | श्री.श्रीराम महाराज कांगणे (हनुमान महाराज संस्थान) | श्रीराम गणपती कांगणे |
| ७ | ठाकुर बुवांची दिंडी | गोपाळराव भागवतबुवा गरूड (ठाकूर) |
| ८ | वै.गु.कुंभार गुरूजी वा.शि.संस्था दिंडी | पंडीतराव चिंतामण क्षीरसागर |
| ९ | संत आजामेळ दिंडी | महेश हणमंत नाईकवाडे |
| १० | मुक्ताबाई महाराज बेळगावकर दिंडी | मारूती ज्ञानोबा कोकाटे |
| ११ | आळंदीकर दिंडी | ज्ञानेश्वर मारूती दिघे |
| १२ | वै.सद्गगुरू विठ्ठलबुवा फुरसुंगीकर दिंडी | सुनिल ज्ञानेश्वर हरपळे |
| १३ | जनार्दनबुवा उखळीकर दिंडी | रामेश्वर रंगनाथ ननवरे |
| १४ | आळंदीकर दिंडी | ज्ञानेश्वर मच्छिंद्रनाथ गुळुंजकर |
| १५ | शेडगे पंच मंडळी दिंडी | धनंजय बद्रिनाथ बडदे |
| १६ | अमरावतीकर दिंडी | पद्माकर महाराज देशमुख |
| १७ | श्री.रोकडोबाबा दिंडी | दीपक महादेव मुंगसे |
| १८ | होराळकर दिंडी | शंकर कुमार चव्हाण |
| १९ | आंबेकर उजरेकर दिंडी | भागवत वासूदेव चवरे |
| २० | एकनाथ बुवा कराडकर दिंडी | तुकाराम एकनाथ कराडकर |
| २१ | दौलतबुवा आंधळे दिंडी | शरद विष्णुपंत गायकवाड |
| २२ | श्री सोपानकाका कराडकर दिंडी | यादव राजाराम संपत |
| २३ | वै.केदार बाबा कराडकर दिंडी | प्रविण (बाबा) बाळासाहेब साळुंखे |
| २४ | जळगांवकर दिंडी | ज्ञानेश्वर नामदेव देशमुख- जळगावकर |
| २५ | भोई समाज दिंडी | बाळकृष्ण गुलाबराव तिकोने |
| २६ | कोकण विभाग, दिंडी | महेश तुकाराम शिगवण |
| २७ | भानुदास टेंभुकर दिंडी | निवृत्ती उध्दव हुलवान |
| २८ | शंभू ढोराळकर दिंडी | ज्ञानेश्वर वसंत चव्हाण |

| संत शिरोमणी श्री.संत ज्ञानेश्वर महाराज संस्थान, आळंदी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **दिंडीचे नांव** | **दिंडी प्रमुखाचे नांव** |
| २९ | टेंभूकर दिंडी | श्रीकांत पांडूरंग हुलवान (टेंभुककर) |
| ३० | भोरकर दिंडी | नंदकिशोर निवृत्ती नाळे |
| ३१ | ढवळीकर दिंडी | देविदास ज्ञानेश्वर कदम |
| ३२ | श्री.ज्ञानेश्वर महालिंग नगरे दिंडी | ज्ञानेश्वर महालिंग नगरे |
| ३३ | खंडूजीबाबा दिंडी | एकनाथ निवृत्ती राजुकर |
| ३४ | दिनकरराव रामचंद्र पाटील (धुईखेडकर ) दिंडी | दिनकरराव रामचंद्र पाटील (धुईखेडकर) |
| ३५ | नानाबुवा वडगांवकर दिंडी | अनिल पंढरीनाथ पंचावाघ |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.08.16 18:08:59 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**